**केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सपववि-४००१४/२/२०२४-DESKSERICULTURE-CMTD**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र.CSB-37/1/ CSs(SS-2) Maharashtra/2021-26/ Vol.1, दि.२७.०३.२०२३.
२) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्या-९/सिल्क समग्र./Gen,SC&ST/केंव रा हि/ B.D.S./४७८, दि.१८.०४.२०२३.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०५.०२.२०२४.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सपववि-४००१५/२/२०२३-DESK SERICULTURE-CMTD, दि.०९.०२.२०२४.
६) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्यासन-९/केंद्र पुरस्कृत/सिल्क समग्र-२/ निधी/बीडीएस/ २३-२४/२९१, दि.२१.०२.२०२४.
७) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०४.०३.२०२४.
८) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्यासन-९/केंद्र पुरस्कृत/सिल्क समग्र-२/ २२-२३-जनरल/नि.मा/सन २०२४, दि.११.०३.२०२४.

**प्रस्तावना : -**

केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) ही योजना सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीत राज्यात राबविण्यास दि.०९.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांना केंद्र हिस्सा ₹ २२९.४३३४ लक्ष व त्यास पुरक राज्य हिस्सा ₹ १२८.६२५९ असा एकूण ₹ ३५८.०५९३ लक्ष इतका निधी उपलब्ध करून देण्याची विनंती संचालक रेशीम यांनी संदर्भाधीन दि.११.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदर प्रस्ताव वित्त विभागास सादर केला असता वित्त विभागाने निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने संचालक (रेशीम) यांनी केलेल्या विनंतीनुसार उक्त निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) या योजनेंतर्गत सन २०२२-२३ मधील सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठीचा अखर्चित केंद्र हिस्सा ₹२२९.४३३४ लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹१२८.६२५९ लक्ष असा एकूण ₹३५८.०५९३ लक्ष इतका निधी पुढील तक्त्यात नमूद केलेल्या बाबींसाठी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रक्कम रु.लाखात)**

| योजनेचे नाव (१) | युनिट कॉस्ट (२) | भौतिक संख्या (३) | हिस्साचे प्रमाण (केंद्र : राज्य: लाभार्थी ) | केंद्र हिस्सा (४) | राज्य हिस्सा (५) | एकूण निधी (४+५) (६) |
|---|---|---|---|---|---|---|
| **अ) सर्वसाधारण लाभार्थी** | | | | | | |
| किसान नर्सरी विकासासाठी सहाय्य | १.५० | ४ | ५०:२५:२५ | ३.०० | १.५० | ४.५० |
| तुती रेशीम कीटक संगोपन पॅकेज (२५० अंडीपुंज क्षमता) लागवड (२ एकर) | १.२० | २ | ५०:२५:२५ | १.२० | ०.६० | १.८० |
| तुती रेशीम कीटक संगोपन पॅकेज (१५० अंडीपुंज क्षमता) लागवड (१ एकर) कीटक संगोपनगृह बांधकामासाठी सहाय्यता योजना (६०० स्के.फुट) | ३.२५ | २२ | ५०:२५:२५ | ३५.७५ | १७.८७५ | ५३.६२५ |
| चॉकी सहाय्य (बाल कीटक संगोपन केंद्र स्थापना) | १३.०० | १ | ५०:२५:२५ | ६.५० | ३.२५ | ९.७५ |
| ॲटोमॅटीक रिलींग युनीट स्थापना (ARM) (४०० एंन्डस) | १४९.६६५ | २ | ५०:२५:२५ | १४९.६६५ | ७४.८३२५ | २२४.४९७५ |
| व्हिस्टींग युनीट स्थापना (४८० स्पिंडल) अर्थसहाय्य | ११.०० | १ | ५०:२५:२५ | ५.५० | २.७५ | ८.२५ |
| अस्तित्वातील रिलींग उद्योजक यांना ॲटोमॅटीक रिलींग युनीट स्थापना (ARM) (४०० एंन्डस) | ६९.५४६ | २ | २०:२०:६० | २७.८१८४ | २७.८१८४ | ५५.६३६८ |
| **एकुण रक्कम** | | | | **२२९.४३३४** | **१२८.६२५९** | **३५८.०५९३** |

२. सदर निधी केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) सुधारीत मानकांना दिलेल्या प्रशासकीय मंजूरीनुसार व त्या संदर्भातील मार्गदर्शक सुचनांनुसार संचालक (रेशीम) यांनी खर्च करावा. तसेच, ज्या बाबींसाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध केला आहे, त्याच बाबींवर सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीतून झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्रीय रेशीम मंडळ व शासनास विहीत मुदतीत सादर करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

३. सदर योजनेंतर्गत अनुदान देताना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नानाजी देशमुख कृषि संजिवणी योजना (पोक्रा) व इतर शासकीय योजनेंतर्गत लाभ दिला नसल्याची खात्री करून तसेच बाबनिहाय अनुदानाची द्विरूक्ती होणार नाही याची खातरजमा करून पात्र लाभार्थ्यांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

४. सदर योजनेचा लाभ डीबीटी प्रणालीच्या मार्गदर्शक सुचनाप्रमाणे लाभार्थ्यांना अदा करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर योजनेंतर्गत लाभार्थ्यांनी लाभ घेतलेल्या बाबीअंतर्गत उभारण्यात आलेल्या मालमत्तेचे जीओ टॅगीग करणे बंधनकारक राहील.

६. सदर योजनेच्या लाभ दिल्यांनतर/अंमलबजावणीनंतर प्रकल्प/लाभार्थी केंद्रित घटकांचे व्हिडिओ दस्तऐवजीकरण करणे बंधनकारक असून याबाबतची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

७. राज्यात लोकसभा सार्वत्रिक निवडणूक २०२४ करीता दि.१६.०३.२०२४ पासून आचार संहिता लागू करण्यात आली आहे. सदर आदर्श आचार संहितेचा भंग होणार नाही, याची दक्षता संचालक (रेशीम) यांनी घ्यावी.

८. सदर योजनेंखाली केंद्र हिश्श्यासाठी ₹२,२९,४३,३४०/- फक्त (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणतीस लक्ष त्र्येचाळीस हजार तीनशे चाळीस फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४९) रेशीम उद्योगाचा विकास (केंद्र पुरस्कृत) (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२८५११२६९), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" अंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच, राज्य हिश्श्यासाठी ₹ १,२८,६२,५९०/- फक्त (अक्षरी रुपये एक कोटी अठ्ठावीस लक्ष बासष्ट हजार पाचशे नव्वद मात्र) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४५) रेशीम उत्पादक, खादी ग्रामोद्योग व ग्रामोद्योग विकास (कार्यक्रम) (२८५११२०४), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" अंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

९. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी लेखाधिकारी, रेशीम संचालनालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V०००३) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.३१०/२०२४, दि.३०.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**११.** सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२४०३३११२०६२५६७०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRADDHA DEVEN KOCHAREKAR

Digitally signed by SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC51883E2B27843640CD6C07C96E3E8715CC5BFBE554420E4D68E5F4B112388A, cn=SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
Date: 2024.03.31 12:16:28 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
४) सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे स्वीय सहायक
५) उप सचिव (अर्थसंकल्प) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
७) सदस्य-सचिव, केंद्रीय रेशीम मंडळ, बंगळूरु.
८) कोषागार अधिकारी, नागपूर.
९) संबधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१२) सर्व प्रादेशिक रेशीम कार्यालये.
१३) सर्व जिल्हा रेशीम कार्यालये.
१४) अवर सचिव (का-१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती (रेशीम कक्ष).